**शालार्थ क्रमांक देताना झालेल्या अनियमिततेची चौकशी करण्यासाठी चौकशी समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. शालार्थ ११२०/प्र.क्र.६१/२०/टिएनटी-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगूरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक- १४ ऑगस्ट, २०२०

**प्रस्तावना :-**

राज्यातील खाजगी अनुदानित प्राथमिंक, माध्यमिक व उच्च माध्यमिक तसेच जिल्हा परिषद महानगरपालिका व नगरपालिका शाळामधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करणेसाठी शासन निर्णय दि. ७.११.२०१२ अन्वये शालार्थ संगणकीय प्रणाली लागू करण्यात आली. सदर संगणकीय प्रणालीत समाविष्ट होण्यासाठी प्रत्येक शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी यांना शालार्थ क्रमांक देण्यात येतो. पुर्वी त्या त्या जिल्ह्यातील शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) यांचेकडून शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी यांना शालार्थ क्रमांक देण्यात येत होते. तथापि, आयुक्त शिक्षण यांनी दि.१८.११.२०१६ रोजीच्या पत्रान्वये सदर अधिकार शिक्षण संचालक प्राथमिक व शिक्षण संचालक माध्यमिक व उच्च माध्यमिक यांना प्रदान करण्यात आले होते. परंतू, बऱ्याच मोठ्या प्रमाणावर प्रलंबित असलेले प्रस्ताव संचालक यांचेकडे सादर करण्यात आल्यामुळे शालार्थ क्रमांक प्रदान करण्याच्या कार्यवाहीस विलंब होत असल्याचे निर्दशनास आल्यामुळे प्रलंबित शालार्थ प्रस्ताव तातडीने निकाली काढण्यासाठी शासन निर्णय दि. २८.२.२०१८ अन्वये आयुक्त शिक्षण यांचे अध्यक्षतेखाली विशेष कृती दल गठीत करण्यात आले होते. तदनंतर प्रलंबित शालार्थ प्रस्ताव निकाली निघाल्यामुळे दि. २८.२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेले कृती दल दि. २०.३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये संपुष्टात आणून शालार्थ क्रमांक देण्याचे अधिकार शिक्षण अधिकारी/शिक्षण निरिक्षक यांनी दिलेल्या वैयक्तिक मान्यतेच्या बाबतीत त्याच विभागातील शिक्षण उपसंचालक यांना, विभागीय शिक्षण उपसंचालक यांनी दिलेल्या वैयक्तिक मान्यतेच्या बाबतीत विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक विभागीय शिक्षण मंडळ, तसेच पवित्र पोर्टल द्वारे नियुक्त होणाऱ्या शिक्षकाचे नाव शालार्थ प्रणालीत समाविष्ट करण्याचे अधिकार संबधित जिल्ह्यातील शिक्षणाधिकारी/शिक्षण निरिक्षक (प्राथमिक/माध्यमिक) याना प्रदान करण्यात आलेले आहेत.

दरम्यान, जळगाव जिल्ह्यातील सात शिक्षण संस्थामधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी यांना शालार्थ क्रमांक देण्यामध्ये झालेल्या अनियमिततेसंदर्भात मा. विधानमंडळात मा. श्री किशोर पाटील व इतर विधानसभा सदस्य यांनी लक्षवेधी सूचना उपस्थित केलेली होती. सदर लक्षवेधी सूचनेवरील चर्चेवेळी मा. मंत्री शालेय शिक्षण यांनी मा. सभागृहामध्ये नाशिक विभागातील गेल्या एक वर्षामध्ये देण्यात आलेल्या सर्व शालार्थ क्रमांकाबाबत चौकशी करून संबधिताविरूद्ध शिस्तभंगविषक कार्यवाही सुरू करण्यात येईल तसेच राज्यामध्ये गेल्या एक वर्षामध्ये देण्यात आलेल्या शालार्थ क्रमांकाबाबतही सखोल करण्यात येईल असे आश्वासन दिलेले होते. त्यानुसार नाशिक विभाग तसेच राज्यामध्ये शालार्थ क्रमांक देताना झालेल्या अनियमिततेची चौकशी करण्यासाठी चौकशी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नाशिक विभागातील खाजगी अनुदानित प्राथमिक व माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळामधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना शालार्थ क्रमांक देताना तसेच राज्यात मागील एका वर्षात शालार्थ क्रमांक देताना झालेल्या अनियमिततेची चौकशी करण्यासाठी श्री दिनकर टेमकर, शिक्षण सहसंचालक (प्राथमिक) यांचे अध्यक्षतेखाली चौकशी समिती गठीत करण्यात येत आहे .

२. सदर समितीने नाशिक विभागातील शालार्थ क्रमांक देताना झालेल्या अनियमिततेची चौकशी करताना दि. २०.३.२०१९ नंतर विभागीय शिक्षण उपसंचालक नाशिक विभाग नाशिक यांनी शालार्थ क्रमांक दिलेल्या प्रकरणाची चौकशी करावी. तसेच सदर समितीने राज्यातील शालार्थ प्रकरणाबाबत दि.२०.३.२०१९ नंतर संबधित विभागाचे विभागीय शिक्षण उपसंचालक यांनी शालार्थ क्रमांक दिलेल्या प्रकरणी प्राप्त झालेल्या तक्रारीच्या अनुषंगाने चौकशी करून शासनास सहा महिन्याचे आत अहवाल सादर करावा. आयुक्त शिक्षण यांनी चौकशी समितीसाठी आवश्यक असणारा कर्मचारी वर्ग श्री. दिनकर टेमकर शिक्षण सहसंचालक (प्राथमिक) यांना उपलब्ध करून द्यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८१४१५२१२१२८२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAMDAS GANPAT DHUMAL

Digitally signed by RAMDAS GANPAT DHUMAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3246a8286e67ae7423b98bfd800865585eb8601521f097ab07142d65ea9b2b15, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=24f4acddcff993441f6c634862546e9d122e0db556806b179b794879acf360f5, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAMDAS GANPAT DHUMAL
Date: 2020.08.14 15:35:22 +05'30'

**( रामदास धुमाळ )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१) राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल मुंबई
२) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४) महालेखापाल, ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई, नागपूर
५) महालेखापाल, ( लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई, नागपूर
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी
७) आयुक्त ( शिक्षण ), महाराष्ट्र राज्य, पुणे
८) शिक्षण संचालक ( प्राथमिक ) , महाराष्ट्र राज्य, पुणे
९) शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक ), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) संचालक, विद्यापरिषद, पुणे
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१३) सर्व शिक्षणाधिकारी / शिक्षण निरीक्षक ( माध्यमिक / प्राथमिक )

१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

१५) सर्व अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक (प्राथमिक/माध्यमिक)

१६) वित्त विभाग ( कोषा प्रशा -५ ), मंत्रालय, मुंबई

१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, अर्थसंकल्प कार्यासन / संगणक शाखा, मंत्रालय, मुंबई

१८) निवड नस्ती-टिएनटी-३.